Ichalkaranji Granthmala No. 4.

# GERMAN BHÂSHÂPRAVESH.

*( Introduction to German Language. )*



BY

**Prof. S. B. Hudlikar, M. A.**

Geologist and Mining Engineer (Germany).
Sometime Professor and Fellow
of
The Benares Hindu University.

**Price Rs. 3.**



**1929.**

इचलकरंजी ग्रंथमाला, पुस्तक चवथें.

# जर्मन भाषाप्रवेश.



लेखक.
प्रो. सत्यबोध बाळकृष्ण हुदलीकर, एम्. ए.
जिऑलजिस्ट व मायनिंग इंजिनियर (जर्मनी).
भूतपूर्व प्रोफेसर व फेलो बनारस
हिंदू युनिव्हर्सिटी.

किंमत ३ रुपये.



१९२९



# समर्पण.

मराठी भाषेवर प्रेम करणाऱ्या
व
मराठीमधूनच सारे विषय
शिकविण्यासाठीं
आटोकाट प्रयत्न करणाऱ्या
साऱ्या महाराष्ट्रीयांना
ही माझी अल्प कृति
समर्पित असो !

स. बा. हुदलीकर.

# पुस्तकपरिचय



मराठी वाचकांच्यासाठी जर्मन भाषेसंबंधी कांही माहिती द्यावी असे माझ्या मनांत आज बरेच वर्षांपासून वागत आहे. जर्मनभाषा आजकाल अत्यंत उच्च शिखराला पोहोंचलेली आहे, व ती आमच्या संस्कृतप्रमाणें किंवा मराठीप्रमाणें विलक्षण लवचीक असल्यामुळें तिची उत्तरोत्तर वाढच होत चालली आहे. तशात जगांतील अत्यंत विद्वान् पंडित हे बहुधा जर्मनच असल्यामुळे त्यांनी आपले अपूर्व ज्ञानभांडार सारे आपल्या प्रिय मातृ ( पितृ ) भाषेमध्येंच भरून ठेविलेलें आहे, व दिवसेंदिवस त्यांनी आपले अपूर्व काम मोठ्या उत्साहानें व कसोशीने चालविलेले आहे।

नवीन नवीन शोध, व अनेक विषयातील संशोधनकार्य हे बहुतेक जर्मन भाषे-मध्येंच प्रसिद्ध होत असल्यामुळे आमच्या हिंदी पंडितानाही जर्मनभाषा थोडी तरी जाणणे अत्यंत आवश्यक झाले आहे. संस्कृत, पाली, प्राकृत किंवा अर्धमागधी यासारख्या विषयातील नानाविध संशोधन जर्मन भाषेतूनच प्रसिद्ध होते, व आपल्या पंडिताना जगांतील घडामोडींशी संबंध ठेवणें अत्यंत आवश्यक झालें असल्यामुळे त्यांचीही प्रवृत्ति जर्मन शिकण्याकडे हळूहळू होऊ लागली आहे. शास्त्रीयग्रंथ, वैद्यकी, तत्त्वज्ञान, अर्थशास्त्र वगैरे विषयांतही संपूर्ण माहिती मिळविण्यासाठी त्या त्या विषयातील जर्मन ग्रंथ वाचणे अवश्यक झाले आहे. पण इंग्रजीमधून जर्मन शिकणे आपणास ( महाराष्ट्रीयांना व इतर हिंदी माणसाना सुद्धा ) बरेच कठीण जात असल्यामुळे, व उच्चार प्रथम प्रथम अमळ कठीण वाटत असल्यामुळे, जर्मन भाषा शिकण्याची इच्छा असून सुद्धा आपल्याला अनंत अडचणी वाटेत उभ्या असलेल्या दिसतात, व कार्य साध्य होत नाहीं. या अडचणी अंशतः तरी दूर कराव्या या हेतूने प्रेरित होऊन मी हा अल्पसा प्रयत्न केला आहे. जर्मन भाषा ही व्याकरण-शुद्ध व बहुतांशी व्याकरणबद्ध असल्यामुळें व्याकरणरूपानेंच हे पुस्तक लिहिण्यात आलेलें आहे.

हे पुस्तक लहान शाळेंतील विद्यार्थ्यांच्यासाठी मूलतः नसून, ते प्रौढपणी लवकर जर्मन भाषा शिकण्याच्या इच्छेनें प्रेरित झालेल्या लोकांच्यासाठी आहे. अर्थात् त्याचा विद्यार्थ्यांप्रमाणेंच इतर साऱ्यानांच उपयोग होईल अशी मला उमेद आहे. या पुस्तका-वरून जर्मन भाषा तीन महिन्यांत चांगली समजूं लागेल अशी मला आशा आहे. पण प्रयत्न मात्र कसून करावा लागेल. या पुस्तकाच्या शेवटी जर्मन–मराठी

असा लहानसा शब्दकोश दिलेला आहे. त्याचा वाचकांना बराच उपयोग होईल. मोठा जर्मन-मराठी शब्द--कोशही लवकरच वाचकांच्या हाती देण्याचा प्रयत्न चालू आहे. तो सफल होणे हे सर्वस्वी वाचकांच्या सदिच्छेवरतीच अवलंबून असणार. वाचकांच्या सोईसाठी कांही उत्तम उत्तम जर्मन पुस्तकांची भाषांतरेही लिहून तयार आहेत. ती लवकरच छापून तयार होऊन वाचकांच्या हाती पडल्यास जर्मन भाषा उत्तम जाणण्याला त्याचा बराच उपयोग होईल, अशी आशा आहे.

लो. मा. टिळकांना आपल्या अद्वितीय गीतारहस्याच्या पूर्वतयारीसाठी जर्मन भाषा शिकणे अवश्य वाटून, त्यांनी प्रत्यक्ष मंडालेच्या अज्ञातवासात जर्मनभाषा शिकून घेतली, या गोष्टीचा विचार आपल्याला थक्क करून सोडतो! म्हणून गीतेच्याच भाषेत किंवा जर्मन तत्ववेत्ता एमान्युएल कांट याच्या भाषेत सांगावयाचें म्हणजे = Tue deine Pflicht nach dem Erfolg des Handelns frage nicht " तूअे दायनें फ्लिश्ट नाख् देम् एर्फोल्ग देस् हान्डेल्न्स् फ्रागे निश्ट म्हणजे " आपले कर्तव्य करीत जा, फळ काय मिळेल इकडे लक्ष देऊ नकोस. " याच न्यायाने मला जर्मन भाषाविषयी मराठीतून अल्पसा प्रयत्न करावा असे वाटले व त्याप्रमाणे मी तो यथाशक्ति पार पाडला आहे. तो वाचकास प्रिय होवो, एवढेच!

म. वा. हुदलीकर.

# शिक्षकांसाठीं विशेष सूचना



( १ ) प्रथम अगदीं शास्त्रशुद्ध मूळाक्षरांचे उच्चार करण्यास शिकवावें. मराठीत ( बालबोधींत ) ते उच्चार फळ्यावर लिहून दाखवावे व तोंडानें त्याचा स्पष्ट उच्चार करून तो विद्यार्थ्यांच्याकडून करवून घ्यावा. काम मात्र अगदीं पायाशुद्ध झाल्याशिवाय पुढील प्रयत्न निष्फळ होतील हें पक्के ध्यानांत ठेवावें.

( २ ) आम्हीं दाखविलेले उच्चार हे अस्सल जर्मन म्हणजे ऱ्हाइनलांडमधील उच्चार आहेत. इतर ठिकाणीं देशपरत्वे उच्चार अलग अलग आहेत हें आम्हांस कबूल आहे. पण ऱ्हाइनलांडमधील उच्चार हे पुण्याकडील मराठीप्रमाणें शुद्ध आहेत म्हणून तेच विद्यार्थ्यांना शिकविणें इष्ट आहे. उच्चाराची धाटणी एकदां नीट समजली म्हणजे पुढें फार सोपें जातें असा आमचा अनुभव आहे

( ३ ) धड्यांतील व्याकरण नीट समजाऊन सांगावें व धडे मोठ्यानें वाचवून लिहून घ्यावेत, म्हणजे तोंडानें वाक्यें व वाक्यरचना ही फार सौकर्यानें जमतात. पाठांतर जरूर पाहिजे, पण तें व्यर्थ भाराभर मात्र असूं नये. लिहिण्यासुद्धां विशेष खबरदारी घ्यावी.

( ४ ) आतां ज्या कोणाला गुरूशिवायच जर्मन शिकावयाचें असेल त्यांना निदान पहिले कांहीं दिवस तरी जर्मन शब्दांचे उच्चार, व सर्व साधारण उच्चारपद्धति ही गुरुमुखानेंच शिकावी, म्हणजे पुढें त्रास होणार नाहीं. मग मात्र पुढचें कार्य फार सोपें आहे.

( ५ ) कोणतीही परकी भाषा शिकतांना आपल्याला शब्दसंपत्तीची फार जरूरी असते. म्हणून आमच्या धड्यांतून अनेक शब्द वेळोवेळीं दिलेले आहेत, त्यांचा फायदा वाचकांनी जरूर घ्यावा.

( ६ ) व्याकरणाबरोबरच सुरूप व मुद्देसूद असें वाचनाचें साधन या पुस्तकांतच दिलेलें असल्यामुळें प्रथम तरी इतर पुस्तकें वाचण्याची आवश्यकता नाहीं. कविता दिलेल्या आहेत त्यांचा अर्थ नीट समजावून घेऊन त्या पाठ कराव्यात व मोठ्यानें म्हणाव्या म्हणजे उच्चारांची भानगड वाटणार नाहीं.

( ७ ) जर्मनमध्यें इंग्रजीप्रमाणें स्पेलिंगची भानगड मुळींच नाहीं.

# कॅपिटल वर्णमालेसंबंधीं कांहीं नियम.

जर्मनमधील कॅपिटल वर्णमालेंत व इंग्रजी कॅपिटल वर्णमालेंत कांहीसा फरक आहे. तो अभ्यासकांनी नीटपणें ध्यानांत ठेवणें इष्ट आहे.

( १ ) जर्मन भाषेंतील प्रत्येक नाम किंवा नामवाचक शब्द या साऱ्यांचें पहिलें अक्षर नेहमीं कॅपिटल लिहिलेंच पाहिजे असा नियम आहे.

जसें :— Mann, Kind, Hund, Schaf etc. किंवा, der Alte = म्हातारा माणूस. der Kranke = आजारी माणूस.

( २ ) एखाद्या व्यक्तीच्या किंवा, गांवाच्या नांवावरून एखादें विशेषण बनलें असल्यास त्याचें पहिलें अक्षर कॅपिटल असावें लागतें.

जसें :—Berliner Zeitung, Frankfurter Nachrichten. पण एखाद्या देशाच्या नांवावरून जर विशेषण बनले असेल तर मात्र त्याचें पहिलें अक्षर कॅपिटल लिहिलें जात नाही.

जसें :—Das englische Volk = इंग्रजी जनता.

( ३ ) त्याचप्रमाणें Sie = तुम्ही, आपण किंवा Ihr आपण, इ. या शब्दांमधील पहिलें अक्षर कॅपिटल असतें.

अपवाद :—ich = मी यांतील i हे साधेंच लिहिले जातें.

याशिवाय इतर प्रसंगी जर्मनमध्यें इंग्रजीप्रमाणेंच कॅपिटल अक्षर वापरण्याची पद्धती आहे.

जसें :—( अ ) ठेविलेलें नांव; England, Deutschland, Indien, Goethe, Wilhelm, Anna,

( ब ) एखादी व्यक्ती दुसऱ्या व्यक्तीपासून विभिन्न आहे हें दर्शविण्यासाठी पहिलें अक्षर कॅपिटल वापरलें जातें.

जसें:—Kaiser Wilhelm der Grosse, या ठिकाणी G कॅपिटल आहे. इत्यादि.

# प्रकाशकाचे दोन शब्द.

——————:०:०:——————

**इचलकरंजी ग्रंथमालेंतील** चवथें पुस्तक " **जर्मन भाषाप्रवेश** " आज प्रसिद्ध होत आहे. निरनिराळ्या भाषांच्या बोलण्याच्या व लिहिण्याच्या पद्धतीचा विचार केला असतां, मराठी व जर्मन भाषा यांमध्यें बरेंच साम्य दिसून येईल. अशा स्थितीत हल्लींच्या प्रचलित रूढीप्रमाणें जर्मन अथवा त्याचसारख्या दुसऱ्या भाषांचा अभ्यास, इंग्रजीच्या द्वारें करण्यापेक्षां, प्रत्यक्ष मराठीमधूनच करितां आल्यास सुगम होऊन मार्गही सुकर होईल असें वाटतें.

इतर भाषा शिकतांना परकी भाषेची मध्यस्थी स्वीकारावी लागल्यानें कालाचा विलक्षण अपव्यय होतो, व शिवाय विषय नीटपणें समजत नसल्याकारणानें पुनः घोकंपट्टीकडे साहजिकच प्रवृत्ति होते. या गोष्टी लक्षांत घेतां, प्रो. स. बा. हुदलीकर यांनी लिहिलेल्या " **जर्मन भाषाप्रवेशाचा** " मराठीतून पूर्णपणें व थोड्या अवधीत जर्मन शिकणाऱ्या लहान मोठ्या साऱ्याच अभ्यासकांना अत्यंत उपयोग व्हावा असा अंदाज आहे.

मराठी भाषा ही अत्यंत लवचिक असून तिला संस्कृत शब्दभांडाराचा पूर्ण पाठिंबा असल्यामुळें अनेकविध नवीन शब्दसंपत्ति निर्माण करणें फार सोपें झालें आहे. म्हणून महाराष्ट्रांत सर्वच विषय मराठीतूनच शिकविण्याचा उपक्रम करण्यांत यावा, व तत्प्रीत्यर्थ उपाय अंगिकारित जाणें इष्ट व आवश्यक आहे. त्याच मार्गाचा अवलंब करून आज " **जर्मन भाषाप्रवेश** " महाराष्ट्र जनतेला सादर केला जात आहे. हा प्रयत्न मराठी वाचकांस सम्मत आहे असें वाटल्यास फ्रेंच व इतर तत्सम भाषाप्रवेशही प्रसिद्ध होण्याचा संभव आहे.

पुणें, तारीख २८ }
माहे फेब्रुवारी १९२९ }

**जगन्नाथ रघुनाथ घारपुरे.**

# निवेदन.



"**जर्मन भाषाप्रवेश**" यांची हस्तलिखित प्रत प्रथम कांहीं "नोट्स" च्या रूपानें तयार झाली. पुढें त्याचें रूपांतर हल्लीं प्रसिद्ध होणाऱ्या पुस्तकाच्या रूपांत झालें, पुस्तक तयार झालें तरी तें छापून प्रसिद्ध करणें महाराष्ट्रांत एक मोठीच अडचण असल्याने त्याच्या प्रसिद्धीचा योग इतक्या लवकर येईल असें कधींही वाटलें नव्हतें. पण गुरुवर्य प्रिन्सिपॉल नानासाहेब घारपुरे यांनी आपल्या नेहमीच्या उत्साही औदार्यानें आपल्या "इचलकरंजी प्रथमालेंतील" चवथें पुस्तक म्हणून छापण्यासाठीं घेतलें. म्हणूनच आज त्याला वाचकांच्या हातीं जाण्याचा सुयोग प्राप्त झाला. या ग्रंथमालेच्या योजनेचे उत्पादक श्रीमंत बाबासाहेब, इचलकरंजी संस्थानचे अधिपति, यांचे आभार मानावे तितके थोडे वाटतात. त्याचप्रमाणें प्रिन्सिपॉल नानासाहेब घारपुरे यांचा मी सर्वस्वी आभारी आहे हें नमूद करण्यास मला मोठा अभिमान वाटतो.

पुस्तक छापून होत असतां वाचून पाहून, राहून गेलेली कांहीं दोषस्थळें दाखवून कांहीं उपयुक्त सूचना केल्याबद्दल माझे मित्र, जर्मन भाषेचे आचार्य, डॉ. के. के. जोशी, एम्. ए. पीएच. डी. व्हाईस प्रिन्सिपॉल फर्ग्युसन कॉलेज पुणें यांचा, व माझे दुसरे मित्र डॉ. व्ही. एस. सुखटणकर, एम. ए. पीएच. डी. भांडारकर रीसर्च इन्स्टिटयूट पुणें यांचा मी अत्यंत आभारी आहे. त्याचप्रमाणें माझे तरुण मित्र डॉ० दिनकर धोंडो कर्वे, एम. एससी. पीएच. डी. फर्ग्यूसन कॉलेजांतील रसायन शास्त्राचे आचार्य यांनीही पुस्तक वाचून त्याविषयी प्रशंसोद्गार काढल्याबद्दल त्यांचाही मी अत्यंत आभारी आहें.

शेवटीं आर्यभूषण प्रेसचे आधारस्तंभ रा. रा. केशवराव बाळ, यांनीं मुद्दाम या पुस्तकासाठीं लागणारे नवे टाईप पाडून अत्यंत मेहनतीनें आपल्या हाताखालील मंडळीकडून उत्तम काम करवून घेतलें, याबद्दल मी त्या साऱ्यांचाच आभारी आहें.

सोबत **शुद्धिपत्रक** जोडलें आहे; तरी कांहीं चुका नजर चुकवून राहून गेल्या असण्याचा संभव आहे. वाचक वर्ग त्या शुद्ध करून घेतील अशी मला उमेद आहे.

पुणें, डेक्कन जिमखाना कॉलनी,
ता. २८ माहे फेब्रुवारी १९२९.

स. बा. हुदलीकर.

# अनुक्रमणिका.

## Inhalts-verzeichnis.

—–:ॐ: –


| | | | | |
|---|---|---|---|---|
| | पुस्तक परिचय वगैरे | ... | पान | १—१६ |
| | प्रास्ताविक, जर्मन मूळाक्षरें व त्यांचे उच्चार... | | ,, | १ – ११ |
| १ | धडा पहिला | Der bestimmte Artikel | | ११—१५ |
| २ | ,, दुसरा | ,, unbestimmte ,, | | १५—१८ |
| ३ | ,, तिसरा | संख्या ... ... | ,, | १८—२० |
| ४ | ,, चवथा | नामांच्या विभक्तींविषयीं | ,, | २०—२७ |
| ५ | ,, पांचवा | नामांच्या विभक्तींविषयीं प्र. २ | ,, | २७—३१ |
| ६ | ,, सहावा | ,, ,, प्र. ३ | ,, | ३१—३६ |
| ७ | ,, सातवा | ,, ,, प्र. ४ | ,, | ३६—४१ |
| ८ | ,, आठवा | ,, ,, प्र. ५ | ,, | ४१—४५ |
| ९ | ,, नववा | देश व देशवासीयांची नांवे | ,, | ४६—५१ |
| १० | ,, दहावा | क्रियापदविचार ... | ,, | ५१ –५५ |
| ११ | ,, अकरावा | दुसरें सहाय्य क्रियापद | ,, | ५५—६० |
| १२ | ,, बारावा | तिसरें सहाय्य क्रियापद | ,, | ६१—६४ |
| १३ | ,, तेरावा | सर्वनामें ... | ,, | ६५—७६ |
| १४ | ,, चवदावा | संख्यावाचक शब्द, अंक | ,, | ७६—७९ |
| १५ | ,, पंधरावा | क्रमांक ... ... | ... | ७९—८२ |
| १६ | ,, सोळावा | विशेषण ... ... | ,, | ८२—८५ |
| १७ | ,, सतरावा | विशेषणासंबंधीं आणखी कांहीं विचार | | ८६—८८ |
| १८ | ,, अठरावा | विशेषणांचा तारतम्य भाव | ,, | ८८—९३ |
| १९ | ,, एकोणिसावा | लिंगविचार ... | ,, | ९३—९६ |
| २० | ,, विसावा | आणखी कांहीं सहाय्य क्रियापदें | ,, | ९७–१०५ |
| २१ | ,, एकविसावा | शक्यार्थाविषयीं ... | ,, | १०५–१०९ |
| २२ | ,, बाविसावा | क्रियाविशेषणविचार ... | ,, | १०९–११५ |
| २३ | ,, तेविसावा | ,, (पुढें चालू) ... | ,, | ११५–१२० |
| २४ | ,, चोविसावा | उभयान्वयी अव्ययें ... | ,, | १२०·१३० |
| २५ | ,, पंचविसावा | क्रियापद विचार ... | ,, | १३०–१५२ |
| २६ | ,, सव्विसावा | ,, (पुढें चालू) ... | ,, | १५२–१६५ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २७ | धडा सत्ताविसावा | संयुक्त क्रियापदें | ... | पान | १६५–१७३ |
| २८ | ,, अठ्ठाविसावा | क्रियापद विचार (पुढें चालु) | | ,, | १७४–१८० |
| २९ | ,, एकोणतिसावा | जर्मन वाक्यरचना | ... | ,, | १८०–१८४ |
| ३० | ,, तिसावा | विशेषणांची घटना | ... | ,, | १८४–१८८ |
| ३१ | ,, एकतिसावा | धातुसाधित नामांविषयीं | | ,, | १८८–१९० |
| ३२ | ,, बत्तिसावा | वर्तमान कालवाचक धा. सा. विशेषण | | ,, | १९१–१९२ |
| ३३ | ,, तेहत्तिसावा | नामांची घटना | ... | ,, | १९३–१९७ |
| ३४ | ,, चौतिसावा | जर्मन भाषेंतील कांहीं संक्षिप्त शब्द | | ,, | १९८–१९९ |
| ३५ | ,, पस्तिसावा | कांहीं नेहमीं वापरण्यांत येणारीं वाक्यें व म्हणीं. | ... | ,, | २००–२०६ |

## भाग दुसरा.

| | | |
|---|---|---|
| वाचनासाठीं उपयुक्त पाठ | ,, | २०७-२२६ |
| जर्मन—मराठी—शब्दसंग्रह | ,, | २२७–३३७ |

---

# शुद्धिपत्रक.

( Druckfehler-verzeichnis ).

( सूचना :—या सर्व चुका पुस्तक हाती आल्याबरोबर दुरुस्त करून घ्याव्या अशी विनंति आहे. )

| पान. | ओळ. | खालून किंवा वरून. | चूक. | बरोबर. |
|---|---|---|---|---|
| १८ | १२ | वरून | तुम्ही दोघेजण | तुम्हीं. |
| १८ | ६ | खालून | Vatar | Vater |
| १९ | ४ | वरून | ·dreizig, | *dreissig |
| २३ | १ | खालून | त्यांना लागत, | त्यांना कधी कधी लागत |
| २४ | १२ | वरून | Der Namen | Der Name |
| २६ | ७,८,१० | वरून | der Namen | der Name |
| २६ | ७ | खालून | geschen. | gesehen |
| २७ | ७ | वरून | Funfte | Fünfte |
| ३१ | ३ | वरून | hat Fieber | hatte etc. |
| ३२ | ७ | वरून | Aft. | Ast |
| ३७ | १६ | वरून | Grust, | Gruft |
| ४१ | १० | खालून | Bleiftiften | Bleistifte |
| ४३ | १ | खालून | das Irrtum, | der Irrtum. |
| ४४ | १६ | वरून | Traub, | Traube |
| ४६ | ११ | वरून | hollandisch | holländisch |
| ५२ | ७ | खालून | erein | er ein |
| ५८ | ३ | वरून | wir weden | wir werden |
| ५९ | १५ | वरून | jungere | jüngere |
| ६० | ८ | वरून | und dem | und mit dem |
| ६० | ९ | " | so-dann | sodann |
| ६० | १० | " | eine | einige |
| ६० | १२ | " | In diesem | " In diesem |
| ६० | १५ | " | erscheint | erscheint" |
| ६१ | ३ | " | Fwölfte | Zwölfte |

| पान. | ओळ. | खालून किंवा वरून. | चूक. | बरोबर. |
|---|---|---|---|---|
| ६५ | १४ | वरून | तुम्ही (द्विवचनी) | तुम्हीं (अनेक व.) |
| ८५ | ९ | वरून | Manu | Mann * |
| ९२ | ५ | खालून | kommen | Kommen |
| ९३ | १ | वरून | gebe | gehe |
| १२० | ६ | वरून | gilt | gibt |
| १६५ | ६ | खालून | भतकालवाचक | भूतकालवाचक |
| १६७ | ६ | खालून | misfallen | missfallen |
| १८७ | ५ | खालून | reich | eisenreich |
| ,, | ४ | खालून | eisenreich | reich |
| १९१ | ८ | वरून | kind | Kind |
| १९२ | ८ | वरून | hir | hier |
| १९३ | ४ | वरून | साधा (नामें) | साधी |
| १९५ | ११ | वरून | पुल्लिंगी | स्त्रीलिंगी |
| २०९ | १ | खालून | selnem | seinem |
| २२३ | १३ | वरून | qnellen | quellen |
| २२४ | १८ | वरून | Standsgebuhr | Standsgebühr |
| २२४ | २१ | वरून | kraftig | kraftig |
| २२४ | ३ | खालून | Pfiutzen | Pfützen |
| ३०० | १० | वरून | आक्राति | आवृत्ति. |

* ही चूक पुढें ज्या ज्या टिकाणीं झाली असल्याचें आढळून येईल, त्या त्या ठिकाणीं ती सदर्हूप्रमाणे दुरुस्त करून घ्यावी.

# जर्मनभाषाप्रवेश

## प्रास्ताविक विचार

### जर्मन मूळाक्षरें व त्यांचे उच्चार

जर्मन भाषेंत इंग्रजीप्रमाणेंच एकंदर मूळाक्षरें २६ आहेत, पण त्यांचे उच्चार मात्र इंग्रजीप्रमाणें नसून अमळ निराळे आहेत.—

| अक्षरें. | | उच्चार. | उदाहरण. |
|---|---|---|---|
| A | a | आ | आ. |
| B | b | बे | ब् |
| C | c | त्से | त्स् |
| D | d | डे-दे-दे | ड-द-द् |
| E | e | ए | ए |
| F | f | एफ् | फ् |
| G | g | गे | ग् |
| H | h | हा | ह् |
| I | i | इ | इ |
| J | j | योट् | य् |
| K | k | का | क् |
| L | l | एल् | ल् |
| M | m | एम् | म् |
| N | n | एन् | न् |
| O | o | ओ | ओ |
| P | p | पे | प् |
| Q | q | कू | क़ |
| R | r | एर्् | र् |
| S | s | एस् | स ज् |
| T | t | टे | ट |
| U | u | उ | उ |

| | | | |
|---|---|---|---|
| 𝔙 | 𝔳 | फौ | फ़् |
| 𝔚 | 𝔴 | व्हे | व्ह् |
| 𝔛 | 𝔵 | इक्स् | क्स् |
| 𝔜 | 𝔶 | इप्सिलोन | यू |
| ℨ | 𝔷 | त्सेट् | त्स् |

---

जर्मन मूळाक्षरांचे स्वर, व्यंजनें, संयुक्तस्वर, द्विवृत्तस्वर, व संयुक्तव्यंजनें, असे भाग पडतात.

---

## साधे स्वर, व साधीं व्यंजनें.

एकंदर मुळाक्षरांपैकीं, a, e. i, o, u, y, आणि स्वरांतरित ä, ö, ü, हे साधे स्वर असून बाकीचीं सारीं व्यंजनें आहेत.

---

## स्वरांचे उच्चार.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| a, | दीर्घ उच्चार | आ, | baden | = बाडन्. |
| | ऱ्हस्व ,, | आ, | alt | = आल्ट्. |
| e, | दीर्घ उच्चार | ए, | Mehl | = मेऽल्. |
| | ऱ्हस्व ,, | ए, | gelb | = गेल्ब्. |
| i, | दीर्घ उच्चार | ई, | ihm | = ईम्. |
| | ऱ्हस्व ,, | इ, | frisch | = फ्रिश्. |
| o, | दीर्घ उच्चार | ओ, | Rose | = रोजं. |
| | ऱ्हस्व उच्चार | ओ, | kosten | = कोस्टेन्. |
| u, | दीर्घ उच्चार | ऊ | Mut | = मूट्. |
| | ऱ्हस्व उच्चार | उ | Hund | = हुंड्. (ट्) |
| y, | ईय सारखा कांहींसा | | Cylinder | = त्सियलिंडर. |

---

## द्विवृत्तस्वर, व संयुक्त स्वर. ( **Diphthongs** )

| | | | | |
|---|---|---|---|---|
| aa, | दीर्घ | आ | Haar | = हार्. |
| ai, | | आय्, | Mai | = माय् |
| au, | | आउ, | Traum | = ट्राउम्. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ee, | दीर्घ | ए, | See | = ज़े. |
| ei, | | आय्, | frei | = फ्राय् . |
| eu, | | ऑय् | heute | = हॉयटं. |
| ie, | दीर्घ | ई | viel | = फील्. |
| oo, | दीर्घ | ओ | Boot | = बोट्. |

## स्वरांतरित ( Umlaut ).

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ä, | दीर्घ | ए, | Käse | = केज़ं. |
| | ऱ्हस्व | ए | Männer | = मेन्नर्. |
| au, | | ऑय्, | Fräulein | = फ्रॉयलाइन्. |
| ö, | दीर्घ | ओ़, | schön | = शो़न्. |
| | ऱ्हस्व | ओ़, | öffnen | = ओ़फ्नेन्. |
| ü, | दीर्घ | ऊ़, | Türe | = ट्यूरं. |
| | ऱ्हस्व | ,, | küssen | = क्युस्सेन्. |

ö चा बरोबर उच्चार साधतानां तोंडाचें बोळकें करून ए असा दीर्घ किंवा ऱ्हस्व ए उच्चार करावा व ü चा बरोबर उच्चार करतानां तसेंच तोंडाचें बोळकें करून दीर्घ ई किंवा ऱ्हस्व इ असा उच्चार करावा.

**जर्मन मूळाक्षरांचे उच्चार बहुतेक नित्य असतात, म्हणून त्यांचे उच्चार करणें फार सोपें जातें; मात्र त्यांचे उच्चार अगदीं लिहिल्याप्रमाणेंच असले तरी ते प्रथम गुरुमुखांतूनच समजावून घेणें अत्यंत इष्ट असतें. एकदा उच्चारांची सरळ दिशा ध्यानांत आली म्हणजे पुढें सहसा चूक होण्याचा संभव कमी.**

---

## स्वरांचे यथातथ्य उच्चार.

आधुनिक जर्मनमध्यें ay किंवा ey हे विशेषनामाशिवाय इतर कोठें आढळत नाहींत. जसें Bayern=बायर्न, Meyer मायर. ( लॉर्ड मेयर )

au, äu, eu, **यांचे उच्चारही सोपेसेच आहेत.**

जसें:– Haus = हाऊस् Maus = माउस् , Baum = बाउम्.

Bäume : बॉयमं, Häuser=हॉयज़र, Träume = ट्रॉयमं,

व Leute याचा लॉयटं, heute = हॉयटं, असे उच्चार केले जातात.

**टीपः—शिक्षकांनीं पुढील शब्दांचे योग्य उच्चार करून दाखवून ते विद्यार्थ्यांच्याकडून म्हणवून घ्यावेत. म्हणजे ते तावडतोब तोंडांत बसतील.**

DAS MAGAZIN = दास् मागात्सीन्

dA = दा. dann = दान. alt = आल्ट्.

kalt = काल्ट् der = दे ( अ ) र. Herr = हेर्.

heute = हॉयटं, Berlin = बेर्लीन Der Vater = दे (अ) र फाटर,

Der Grossvater = दे (अ) र ग्रोस् फाटर, Mann = मान्.

Der VATER its ein Mann = देअर फाटर इस्ट् आयन् मान्.

Der Grossvater ist alt = देअर ग्रोसफाटर इस्ट् आल्ट्.

Mäuse = मॉयसं Für die Sommerreise = फ्यूर दी ज़ोमररायजं. Juni = यूनी, Juli = यूली. Weisse Zähne = व्हायसं त्सेनं. Nummer; immer = नुम्मर, इम्मर. Traum = ट्राउम्.

Die Tochter des Hauses = दी टोख्कटर देस् हाउसेस्. Der Sohn Karl May = देअर ज़ोन् कार्ल माय्.

Mein Film मायन् फिल्म. eine = आयनं. Beide Frauen बायडं फ्रावन् Aus aller Welt : आउस् आल्लर व्हेल्ट्.

---

## व्यंजनांचे उच्चार.

B : बे=ब्. Halb हाल्ब् Bank = बांक्. Herbst = हेर्बस्ट्; heben हेबन् या ठिकाणीं हे चा दीर्घ उच्चार करून हेबन् असा उच्चार करावा.

---

C : **चा उच्चार त्से असा आहे; पण कांहीं स्वर पुढें आले असतांना क् असाही उच्चार होत असतो.** त्स्, क्, व स् असे त्याचे उच्चार आहेत a, o, u यांच्या पूर्वीं c आले असतां क् असा उच्चार होतो. e, a, i, ö, y यांच्या पूर्वीं c असेल तर त्स् असा उच्चार होतो.

जसें:— Citrone = त्सिट्रोनं. पण Claudius क्लाउडिउस, Cato काटो, असे उच्चार केले जातात. Farce = फार्स् असा उच्चार असून Accent याचा मात्र आक्त्सेंट् असा उच्चार होतो.

**Ch : चे उच्चार मात्र ३ तऱ्हेनें अलग अलग केले जातात.**

१. Loch, Buch या ठिकाणीं उर्दूतील ख सारखा घशांतून उच्चार करावयाचा असतो. लोख्, बूख्.

२. Ich = इश्. lächeln = लेशेल्न्. Mädchen मेडशेन्. Vaterchen Mammachen; फाटरशेन्, किंवा मामाशेन्. Kirche= किर्शे, Charlotte = शार्लोट

३. क सारखा = Dachs = डाक्स् , Charakter काराक्टर्, Christ क्रिस्ट्;

---

**D = चा उच्चार मराठी ड् सारखा न करतां द् सारखा करीत असतांना दांतांमधून श्वास सोडावा म्हणजे द् व ड् यांच्या दरम्यानचा द् असा उच्चार होईल.**

जसें:—Das Buch = दास् बूख्

त्याचा उच्चार ट् सारखाही होतो. या ठिकाणीं सुद्धां दांतांमधून श्वास सोडावा म्हणजे Hund हुंट् असा बरोबर उच्चार करतां येईल. उच्चारांची बरीच खबरदारी घेऊन मेहनत केल्यास ते मुळींच कठीण जाणार नाहींत.

---

F. **चा उच्चार इंग्रजी फ् सारखा करावा.** म्हणजे फ असें अक्षर उच्चारतांना दांत व ओंठ यांमधून श्वास सोडावा.

---

G = याचा उच्चार ग् असा आहे. पण याचे अनेक अलग अलग उच्चार आहेत त्यांचा वाचकांनीं काळजीपूर्वक अभ्यास करावा.

जसें. Garten = गार्टन्. Gut = गूट. Tag = टाग्. König याचा क्ओनिग् किंवा क्ओनिज् असाही उच्चार प्रचलित आहे. त्याचप्रमाणें Leipzig = चा उच्चार लायप्त्सिश्, किंवा लायप्त्सिग् असाही आहे. bringen, singen यांचे उच्चार ब्रिंगन् किंवा जिंगन् असे होतात. lang, किंवा lange = चा उच्चार लांग् किंवा लांगे असा होत असतो. परभाषेंतून घेतलेल्या शब्दांमधील g चा उच्चार मृदु ज़ प्रमाणें होतो. उ:—Genie. = ज़ेनी

---

H = हा, ह्. Hand = हांड्, Hund = हुंड् ,(ट्) Hut = हूट्. Hundert = हुंडर्ट्. इतर ठिकाणीं तो अनुच्चारित असतो, पण त्या योगें त्याच्या मागील स्वर दीर्घ होतो.

उदाहरणार्थ = Schuh = शू, Ehre = एरं.

---

j चा उच्चार य् आहे, जसें,

Joshi = योशी. Jude = यूडे. Johakim = योहाकीम्. Jahr = यार्. ja = या.

---

K = का = क्. Kind = किंड्, Knie = क्नी. ( जर्मनमध्यें कोणतेंहि व्यंजन अनुच्चारित असत नाहीं. इंग्रजीमध्यें Knee: चा नी असा उच्चार करतात पण त्याचाच जर्मनमध्यें मात्र Knie = क्नी असाच केला पाहिजे. )

---

L. M. & N. & P यांचा एल्. एम्. एन्. पे. म्हणजे ल्. म्. न्. प् असे उच्चार करावयाचे. हे सोपे असल्यामुळें त्यांचा येथें विस्तार करण्याचें प्रयोजन नाहीं. Ph याचा इंग्रजी फ् सारखा उच्चार करावा.

जसें:—Philosophie = फिलोसोफी.

---

Q चा उच्चार क्व् असा आहे. Quelle : क्वेलं.

---

R = एर्, र् सारखा उच्चार होतो. Rat = राट्. Reich = रायश. Jahr = यार्. immer = इम्मर्.

---

S = एस्. स् . पण शब्दाच्या आरंभीं याचा उच्चार अगदीं मृदु ज़् ( या वेळीं दांतांमधून श्वास सोडीत ) असा करावा.

उदाहरणार्थ. Sohn = ज़ोन् ( ज़ो दीर्घ ) sind = ज़िंड्, sein = ज़ायन् पण das चा उच्चार मात्र दास् असा करावा. Was haben Sie? व्हास् हाबेन् ज़ी. Rose = रोज़्. अवयवाच्या शेवटीं आल्यास त्याचा उच्चार स् असा होतो. Fels = फेल्स्

Ss = चा उच्चार स्स सारखा करावा.

जसें:—Messer = मेस्सर्, essen = एस्सेन्. Wasser = व्हास्सर्. Burst = बुर्स्ट्. पण St, किंवा Sp शब्दाच्या आरंभीं आल्यास त्यांचा उच्चार मात्र ष्ट व श्प असा होतो. Stein = ष्टायन्, Spezial श्पेत्सिआल.

Sprechen = श्प्रेशेन्. पण मध्यें किंवा शेवटीं आल्यास त्यांचे उच्चार, स्प, व स्ट असे होतात. उ:— Geist = गायस्ट्

Sch = श. Schuhe = शूअ. Kirsche = किर्शे.

पुढील शब्दांचे उच्चार करण्यास शिकावे. Fass, Fässer, Schloss, Schlösser.

---

T. Th, ट्, (या ठिकाणीं ट् चा उच्चार करतांना दांत आणि ओंठ यांमधून श्वास सोडावा म्हणजे उच्चार अमळ बोबडा असा होईल व तोच खरा त्याचा उच्चार ). Tintenfass = टिंटनफास्. Tante = टांटे.

tion किंवा tient यांचे उच्चार मात्र त्सिओन् त्सिएंट् असे करावे.

जसें:—Nation = नात्सिओन्. Patient = पात्सिएंट्. Patent = याचा उच्चार अर्थात् पाटेंट् असाच होईल. पण Thron = थ्रोन्; Thermos थेर्मास.

---

V = याचे वास्तविक उच्चार दोन आहेत. एक फौ = फ्. (इंग्रजी फ् प्रमाणें).

जसें:— Vogel = फोगल् Motiv = मोटीफ्; किंवा व्ह सारखा Oval = ओव्हाल्.

---

W = व्हे = व्ह् Wein = व्हायन्. Was habe ich = व्हास हाबं इश्.
( व चा उच्चार करतांना तोंडांतून श्वास सोडावा म्हणजे व्ह् सारखा उच्चार होईल. )

---

X = इक्स् इंग्रजी X प्रमाणेंच याचा उच्चार (म्हणजे ग् + स्) नसून (क् + स्) असा आहे.

---

Z = त्सेट् = त्स् = Zahn त्सान् Zeitung त्सायटुंग्.

हे उच्चार पुनः पुनः करून एकदां तोंडांत बसले म्हणजे पुढील कार्य फारच सोपें आहे.

---

## संयुक्त व्यंजनांचे उच्चार.

( अधिक स्पष्टीकरण. )

**ch:**— a, o. u व au यांचें पुढें ch आल्यास त्याचा उच्चार ख ( अमळ घोगरा ) असा होतो.

उ० :—Buch. बूख्, Bach, बाख्.

इतर ठिकाणीं त्याचा श् सारखा उच्चार होतो.

जसें :—ich इश्, dich = दिश्, Bücher = ब्यूशर्, ग्रीक भाषें-तून घेतलेल्या शब्दांमध्यें ch असल्यास त्याचा उच्चार क् असा होतो.

उ० :—Charckter = काराक्टर्.

फ्रेंच भाषेंतून घेतलेल्या शब्दांमध्यें ch असल्यास त्याचा उच्चार श होतो ;

उ० :—Chokolade = शोकोलाडं.

Chs = याचा उच्चार क्स् असा होतो ; याचा व X याचा उच्चार सारखाच आहे.

उ०:—sechs = ज़ेक्स्.

sch = याचा उच्चार श् असा होतो, schon = शोन्,

dt, व th, या दोहोंचाही उच्चार ट् ( दांतांतून श्वास सोडून ) असाच आहे. किंवा th चा कधीं कधीं थ् असाहि होतो.

उ:— Stadt = ष्टाट्, Muth = मूट्, Theater = थेआटर sp, st, या संबंधीं वर आलेंच आहे.

ng, याचा उच्चार ङग् असा आहे. तो मागील अक्षरावर अनुस्वार घेऊन लिहिणें बरें.

उ०:—Zeitung = त्सायटुंग्.

Finger = फिंगर्.

qu = चा उच्चार क्व् असा आहे, Quartier = क्वार्टियर्.

---

## उच्चारासाठीं पाठ.

**टीप :—ज्या स्वरावर ( ‾ ) अशी खूण आहे त्याचा उच्चार दीर्घ करावाचा, नसल्यास उच्चार ऱ्हस्व आहे म्हणून समजावें.**

Das = दास्, kalt = काल्ट्, gār = गार्, sēhr = ज़ेऽर्,
dann = दान्, mit = मिट्, īhm = ईम्, in = इन्,
soll = ज़ोल्, gūt = गूट्, lōs = लोस्, uns = उन्स्.
Ton = टोन्, Būch = बूख्, nūr = नूर्, muss = मुस्.
Kaffee = काफे, üben = ऊबेन् jā = या, Licht = लिश्ट्.
machen = मासेन् , Glas = ग्लास्.

---

## वाचनपाठ

**Vater, Grossvater, Mann, Zimmer, Professor, Bruder, Doktor, Offizier, Stuhl, Buch, Schüler, Schwester, Väter, Grossväter, Männer, Zimmerman, Bucher, Band, Bände, blau, heute, Baum, kaum, lesen, Konigin, Wilhelm ist jung. Gertrud spielt Klavier.**

---

## Accent :—जोराचे स्वरोच्चार.

इंग्रजीप्रमाणेंच जर्मनमध्येंही जोराचे स्वरोच्चारित शब्द आहेत, म्हणजे शब्दांचे उच्चार करतांना त्यांच्या कांहीं विशिष्ट अवयवावर जोर द्यावा लागतो. या जोर देण्याचे प्रकार अनेक आहेत, त्यांचा आपण सांगोपांग विचार करूं या, म्हणजे उच्चार करणें सोपें होऊन ते कानालाही जर्मनप्रमाणें लागतील.

शब्दांच्या अवयवावरून ते दोन प्रकारचें आहेत हें आढळून येईल.

जसें:—साधे शब्द किंवा एकावयवी शब्द, व दोन किंवा अनेक अवयवी शब्द.

एक अवयवी शब्दामध्यें जोर मूळस्वरावरच म्हणजे धातुवाचक अवयवावरच असतो.

उदाहरण:—

( १ ) एकावयवी

जसें:—Gut = गूट्, Mann = मान्.

किंवा दोन अवयवी किंवा अनेक अवयवी.

जसें: —Berufen = बेरूफन

Be-rúfen = बे—रूफन् येथें रू वर जोर आहे.

त्याचप्रमाणें, Empfáng, er–fáhren, Ge–bráuch वगैरे शब्दांमध्यें फांग्, फारन्, ब्राउख या ठिकाणीं मूलधातुवाचक अवयवावरतीच जोर असतो.

त्याचप्रमाणें, Líebe = लीबे, Lóbe = लोबे, lóben = लोबन्, ártig = आर्टिश् (ग्) या शब्दांमध्यें पहिल्या अवयवावरती म्हणजे ली, लो, आ—यावरच जोर पडतो. ( प्रत्येक शब्द नीट उच्चारूनच वाचकांना या जोराविषयीं विशेष माहिती होणार आहे. कोणत्याही परकी भाषेंतील उच्चारांची

खुबी ही योग्य गुरुमुखाशिवाय कळण दुरापास्त आहे. तरी या ठिकाणीं वाचकांच्या सोयीसाठीं शक्य तोंपर्यंत खटपट केलेली आढळून येईल. )

जर्मनमध्यें संस्कृतप्रमाणें किंवा मराठीप्रमाणें बरेचसे सामासिक शब्द बनलेले असतात.—घरधनीण, नवरामुलगा, अनाद्यनंत वगैरे. अशा शब्दांच्यावर कोठें विशेष जोर द्यावयाचा हें आपण पाहूं या.

जर्मन उदाहरणें. Fèldmaus या ठिकाणीं Feld हा एक शब्द असून दुसरा Maus हा आहे. असे जे अनेक जर्मन शब्द आहेत त्यांमध्यें कधीं कधीं पहिल्या शब्दावर तर कधीं कधीं दुसऱ्या शब्दावर जोर असलेला आढळून येईल. आतां जो वरचा Feldmaus हा शब्द आहे त्यांतील पहिल्या म्हणजे फेल्ड पैकीं फे वर विशेष जोर असलेला आढळून येईल.

त्याच प्रमाणें Ostwind = ओंवर जोर आहे. ( ‾ ) अशी खूण स्वरिताची किंवा जोराची समजावी.

कधीं कधीं दुसऱ्या शब्दावरील अवयवावर जोर दिलेला असतो.

जसें:–Jahrhùndert या ठिकाणीं Jahr = यार् ( वर्ष ) hùndert ( शत, शंभर ) असे दोन शब्द आहेत. पण जोर मात्र hùndert पैकीं हुं वर आहे. यारहुंडर्ट् असा उच्चार करावा.

शब्दाच्या शेवटीं, har, haft, heit, kunft, keit, ling, sal, sam, schaft, tum असे जे प्रत्यय लागतात ( त्या योगें जर्मनमध्यें भाववाचक नामें तयार होतात ) त्या वेळीं स्वरित–जोर पहिल्या अवयवावरच असतो.

जसें:—Zukunft = त्सू कुन्फ्ट् = भवितव्य. या ठिकाणी त्सू वरच जोर आहे. Júngling= युंग्लिंग्, (तरुण, उमेदवार, पोऱ्या =) युं वरच जोर आहे.

त्याचप्रमाणें Freundschaft = फ्रॉयंड्शाफ्ट् या ठिकाणीं फ्रॉवरच जोर आहे.

आतां संस्कृतप्रमाणेंच कांहीं उपसर्ग लागून जर्मनमध्यें शब्द बनतात.

जसें:—ant =आन्ट्, ur =ऊर्, bei =बाय्, fort =फोर्ट्, vor =फोर्, zu = त्सू या ठिकाणींसुद्धां, Antwort = आन्ट्वोर्ट, (आ वर.) Urtiere= ऊरटियरं:—प्राचीन प्राणी.

त्याचप्रमाणें Übersetzung = ऊबरसेट्‌त्सुंग्‌ = यू वर जोर आहे. Darstellung या ठिकाणीं डांरष्टेलुंग : डा वरच जोर आहे. इत्यादि.

---

आतां जर्मनमध्यें बरेचसे परकी भाषेंतील शब्द आहेत त्यांच्यापैकीं कोणत्या अवयवावर जोर द्यावयाचा, हें प्रत्येक शब्द ज्या भाषेंतून आला त्यांतील मूळ जोर ज्याप्रमाणें असेल त्याप्रमाणें द्यावयाचा असल्यामुळें तो वाचून ध्यानांत ठेवणेंच इष्ट आहे. फ्रेंच शब्दांमध्यें साधारणतः शेवटच्या अवयवावर जोर असतो उः Genie ज़ेनी, Papier पापियेर.

उदाहरणः—Soldāt = ज़ोल्डांट्‌ = शिपाई.

त्याचप्रमाणें त्यांचें अनेकवचन die Soldaten = दी ज़ोल्डाटेन्‌ = या ठिकाणींसुद्धां डा वरच जोर आहे. Melodie मेलोडी. ( मे ऱ्हस्व डी वर जोर ) Doktor = डोक्टोर = डो ऱ्हस्व, क्टो दीर्घ. अशा प्रकारानें उच्चार करावे.

---

# धडा पहिला



## Erste Lektion = एर्स्टे लेक्त्सिओन्‌.

Der bestimmte Artikel = देअर बेस्टिम्टे आर्टीकल्‌

म्हणजे नियामक उपपद :—जसें—तो—ती—तें. मराठीप्रमाणेंच जर्मनमध्येंही नियामक उपपदाचे पुल्लिंग, स्त्रीलिंग व नपुंसकलिंग असे भेद आहेत.

उदाहरणार्थ.

Der Mann = देअर मान्‌ = तो मनुष्य.
Die Frau = दी फ्राउ = ती बाई.
Das Kind = दास किंड = तें मूल.

Der, die, das या लिंगवाचक नियामक उपपदाचें अनेकवचनी रूप **die** ( दी ) = ते, असें एकच होतें.

उदाः—

| एकवचन | अनेकवचन. |
|---|---|
| Der Mann = | Die Manner. |
| Die Frau = | Die Frauen. |
| Das Kind = | Die Kinder. |

पुढें जर्मनमध्यें मराठीप्रमाणेंच विभक्तीचीं रूपें पण असतात. तीं पुढें दिलीं आहेत.

Einzahl = एकवचन Mehrzahl = अनेकवचन

| | पु. | स्त्री. | न. | ( साऱ्या लिंगांचें अनेकवचन ) |
|---|---|---|---|---|
| प्रथमाः— | der. | die. | das. | die |
| षष्ठीः— | des. | der. | des. | der |
| चतुर्थीः— | dem. | der. | dem. | den |
| द्वितीयाः— | den. | die. | das. | die |

याचप्रमाणें पुढील शब्दही ( दर्शक सर्वनामेंही ) चालतात.

| एकवचन पु. | स्त्री. | न. | | अनेकवचन |
|---|---|---|---|---|
| dieser, | diese. | dieses. | हा, ही, हे. | diese, हे. |
| jener, | jene, | jenes, | तो, ती, ते. | jene, हे. |
| welcher, | welche | welches. | कोणता, ती, तें. | welche. कोणते. |
| jeder, | jede, | jedes, | प्रत्येक ( अनेकवचन नाहीं. ) | |

| | पु. | स्त्री. | न. | अनेकवचन |
|---|---|---|---|---|
| प्रथमाः— | dieser, | diese, | dieses, | diese. |
| षष्ठीः— | dieses, | dieser, | dieses, | dieser. |
| चतुर्थीः— | diesem, | dieser, | diesem, | diesen. |
| द्वितीयाः— | diesen, | diese, | dieses, | diese. |

---

## उदाहरणें.

Dieser Mann, Jene Frau,
Jedes Kind, Jedes Kind, Welcher Mann.
Jeder Prefessor. Diesem Zimmer.
Welches Buch ? Jeder Bruder.
Jede Schwester, Jene Mutter.

---

## शब्द : Wörter : ( व्योर्टर )

Der Vater = तो बाप.
Die Mutter = ती आई.
Der Mann = तो माणूस.
Der König = तो राजा.
Die Konigin= ती राणी.
Der Sohn = तो मुलगा.
Die Tochter = ती मुलगी.
Das Kind = तें मूल.
Die Frau = ती बायको, ती बाई.
Der Garten = तो बाग, तो बगीचा.
Der Hund = तो कुत्रा.
Der Teller = ती बशी, तें ताट.
Der Wein = तें मद्य, ती मदिरा.
Die Feder = ते पेन, ती पेन्सील.

Die Katze = तें मांजर.
Der Professor = तो आचार्य, अध्यापक.
Der Bruder = भाऊ.
Der Grossvater = आजोबा.
Das Zimmer = ती खोली.
Der Offizier = ऑफिसर.
Das Buch = तें पुस्तक.
Der Schwager = मेहुणा

अनेक वचनें:— Die Väter.
Die Grossvater.
die Manner.
die Zimmer.
die·Professoren.
die Bruder.
Der Doktor = वैद्य, पंडित. Die Doktoren.
Die Offiziere.
Der Stuhl = खुर्ची, Die Stuhle.
Die Bücher.
Die Schuler.
Die Schwestern-
Das Klavier = पियानो. Die Klaviere.
Die Puppe = बाहुली. Die Puppen.
Der Tisch = टेबल. Die Tische.

nein = नाहीं. नव्हे. nicht (निश्ट) = नाहीं.
und = आणि, व. ja = या. होय. ist = आहे.
aber : पण, परंतु.

Zahlwörter : **संख्यावाचक शब्द.**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| eins | = आयन्स् | = १ | sechs | = जेक्स् | = ६ |
| zwei | = त्स्वाय् | = २ | sieben | = जीबेन् | = ७ |
| drei | = ड्राय् | = ३ | acht | = आख्ट् | = ८ |
| vier | = फियर् | = ४ | neun | = नॉयन् | = ९ |
| fünf | = फ्युन्फ् | = ५ | zehn | = त्सेन् | = १० |

---

## असणें.

sein : ( जायन् : ) याचा वर्तमानकाळ.

| | | | |
|---|---|---|---|
| ich bin | = मी आहे | wir sind | = आम्हीं आहों. |
| du bist | = तूं आहेस. | Sie sind | = तुम्हीं आहा. |
| er, sie, es, ist | = तो, ती, तें आहे. | sie sind | = ते, त्या, तीं आहेत. |

त्याचप्रमाणें. **haben** = जवळ असणें. मालकीचें असणें या क्रियापदाचा वर्तमानकाळही पुढीलप्रमाणें आहे.

| | | |
|---|---|---|
| Ich habe : | माझ्यापाशीं आहे. | wir haben. |
| du hast | | Sie haben. |
| er, sie, es hat. | | sie haben. |

क्रियापद पहिल्यानें वापरून कर्ता नंतर घेतल्यास प्रश्नार्थक वाक्य बनतें. जसें:—

| | | |
|---|---|---|
| habe ich ? | hat er ? | haben wir ? |
| haben sie ? | sind wir ? | इत्यादि. |

---

## पाठ पहिला.

Aufgabe Eins.

( हा लिहून काढावा व मग मोठ्यानें वाचावा. ).

Hier sitzt der Vater. Der Vater und der Sohn. Die Mutter ist gut. Die Mutter und das Kind. Das Haus ist

gross ( मोठें ). Die Frau sitzt in dem Zimmer. Der Garten ist gut. Der Vater hat das Haus und den Garten. Was ( काय ) tut Wilhelm? Narayen liest in dem Buch. Govinda sitzt auf ( वर ) dem Stuhl. Wer ( कोण ) ist der Professor? Der Bruder ist in Poona aber die Schwester ist in Bombay.

---

## भाषांतरासाठीं पाठ २.

तें घर चांगलें आहे. बाबा खुर्चीवर बसतात. बाबू पुस्तक वाचतो. माझ्यापाशीं ( जवळ ) पाणी आहे. पाणी चांगलें आहे. राजा चांगला आहे. राजा माणस आहे. आजोबा पुण्यांत आहेत. बाबा मुंबईंत आहेत. आम्ही चांगले आहोंत. तो किल्ला राजाचा आहे. तो राणीचा मुलगा आहे.

---

## बोलण्यासाठीं पाठ.

Was ist der Vater? Wer ist in Bombay? Ist Kamala eine Puppe? Wer hat die Puppen? Haben Sie die Bücher? Wer ist alt? Wer ist jung?

Hat das Kind das Buch? Nein das Kind hat das Buch nicht.

---

# धडा दुसरा.

## Zweite Lektion.

आनियामक उपपद : Der unbestimmte Artikel.

| पुल्लिंग. | स्त्रीलिंग. | नपुंसकलिंग. |
|---|---|---|
| ein | eine. | ein. |
| जसें:—ein Mann | eine Frau. | ein Kind. |
| ( एक माणूस ) | ( एक बाई ) | ( एक मूल ) |

मराठीप्रमाणेंच व नियामक उपपदांप्रमाणें यालाही विभक्तीचीं रूपें असतात.

जसें :—

| | पुल्लिंग | स्त्रीलिंग | नपुंसकलिंग. |
|---|---|---|---|
| प्रथमा :– | ein | eine | ein |
| षष्ठी :– | eines | einer | eines. |
| चतुर्थी:– | einem | einer | einem. |
| द्वितीया:– | einen | eine | ein. |

याचप्रमाणें पुढील शब्द चालतात.

kein = नसलेला, नाहीं. जसें

Ich habe kein Brot = माझ्याजवळ भाकरी नाहीं.

Ich habe kine Schwester = मला बहीण नाहीं.

Ich habe keinen Bruder = मला भाऊ नाहीं.

mein = माझा. dein = तुझा. sein = त्याचा.

unser = आमचा. Ihr = तुमचा, आपला ( बहुमानार्थी ).

ihr = तिचा, किंवा त्यांचा ( अनेकवचनी ).

जसें:–unser Vater = आमचे वडील, आमचे बाबा.

unsere Mutter = आमची आई.

unser Buch-Haus = आमचें पुस्तक किंवा घर.

ihre Schwester = तिची बहीण किंवा त्यांची बहीण.

,, Ihre Tante = तुमची मावशी–आत्या, आपली मावशी–आत्या.

sein Buch = त्याचें पुस्तक.

seine Schwester = त्याची बहीण.

---

## शब्द.

| | | | |
|---|---|---|---|
| eine Blume | = फूल. | ein Freund | = मित्र. |
| eine Wand | = भिंत. | eine Freundin | = मैत्रीण. |
| eine Farbe | = रंग. | ein Bild | = चित्र. |
| eine Uhr | = घड्याळ. | eine Gabel | = कांटा ( जेवणाच्या वेळीं वापरतात तो ). |
| eine Rose | = गुलाब ( फूल ). | | |
| eine Stadt | = शहर. | ein Löffel ( पु. ) | = चमचा. |

eine Vase = फूलदान. eine Frucht = फळ.
ein Rock = (पु) कोट, अंगरखा.
ein Messer = (न) चाकू.
ein Kleid = (न) कपडा.
ein Pferd = प्फेर्ड (न) घोडा.
ein Tier = (न) जनावर, प्राणी.

---

Gut = चांगले. Schon = छान, सुंदर. alt = म्हातारा.
Sehr = खूप, पुष्कळ. Wer = कोण. was = काय.
oder = अथवा, किंवा. auch = सुद्धां. Wo = कुठे ?

---

Haben = अनेकवचन.

Wir haben, (आमच्याजवळ आहे).
ihr habt = तुम्हां दोघांजवळ आहे.
Sie Haben = तुम्हांजवळ आहे.
sie haben = त्यांच्याजवळ आहे.

---

## Aufgabe. पाठ ३.

Ich habe eine Rose, aber keine andre ( दुसरे ) Blume. Hat mein Bruder eine Blume? Nein, er hat keine Blume, aber er hat ein schönes Buch. Seine Mutter und Schwester sind sehr gut. Sie haben viele (पुष्कळ) Blumen. Die Mutter ist in einem Zimmer. Sie sitzt auf einem Sofa. (सोफा, कोच) Dieser Mann ist mein Freund. Jener Mann ist unser Freund. Diese Frau hat kein Kind. Das ist mein Buch. Haben sie mein Buch gelesen ( वाचलें ). Ich habe ihren Sohn mein Buch gegeben. ( दिलें ) Dein Hund ist sehr alt. Meine Schwester ist jung, aber meine Mutter ist sehr alt. Ihre Freundin ist auch jung, aber sie hat keinen Bruder. Wo ist die Mutter? Was hat sie in ihrer Hand? Die Blumen haben schöne und viele Farben. Es gibt, weisse, rote, grüne, blaue, und gelbe Blumen. Haben Sie die gelbe

Blumen nicht gesehn? Ja, ich habe sehr viele gelbe Blumen gesehen. An den Wånden hangen viele Bilder.

---

## भाषांतरासाठीं पाठ ४.

Aufgabe fur Übersetzung.

त्या मुलापाशीं भाकरी नाहीं का? हा मनुष्य आमचा मित्र आहे. ही बाई आमची मैत्रीण आहे. माझ्यापाशीं एक पुस्तक आहे पण पेन्सील नाहीं. तुम्हीं हें पुस्तक वाचलें का? नाहीं मी हें पुस्तक वाचलें नाहीं, पण मी तें पुस्तक वाचलें आहे. तुमच्यापाशीं गुलाब आहे का? मी तुमचा मुलगा पाहिला पण तुमची मुलगी पाहिली नाहीं. माझ्या आईची बहीण म्हातारी आहे. तिचा मुलगा माझा भाऊ आहे. माझें मांजर कोठें आहे? माझें पुस्तक कोठें आहे?

---

जर्मनमध्यें Du, Ihr, हे मराठी प्रमाणेंच नातलगांना किंवा अधिक परिचितांनाच लावतात. तूं किंवा तुम्हीं ~~[illegible]~~ असा त्यांचा अर्थ आहे. पण जर्मनमध्यें नवरा बायकोला व बायको नवऱ्याला तूं = Du असेंच संबोधितात.

( पुढील वाक्यें तोंडानें म्हणावीं. )

---

## पूर्णभूत.

gesehen = पाहिलें. gefunden = सांपडलें.
geschrieben = लिहिलें. verloren = हरवलें.

---

Ich habe mein Buch verloren.
Ich habe meinen Vater gesehen.
Haben Sie Ihre Mutter gesehen?
Hast du das Kind gefunden?
Hat er mein Buch gelesen ( वाचलें )
Hat Sie meine Mutter und meine Schwester gesehen?
Wir haben keinen Brief gelesen.

---

# धडा तिसरा.

## Dritte Lektion.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| elf | = | ११ | zweiundzwanzig | = | २२ |
| zwölf | = | १२ | dreißig | = | ३० |
| dreizehn | = | १३ | vierzig | = | ४० |
| vierzehn | = | १४ | funfzig | = | ५० |
| funfzehn | = | १५ | sechzig | = | ६० |
| sechzehn | = | १६ | siebzig | = | ७० |
| siebzehn | = | १७ | achtzig | = | ८० |
| achtzehn | = | १८ | neunzig | = | ९० |
| neunzehn | = | १९ | hundert | = | १०० |
| zwanzig | = | २० | tausend | = | १००० |
| einundzwanzig | = | २१ | | | |

---

Die Jahreszeit = ऋतुकाल ( वसंत वगैरे )

Der Monat = महिना.

Das Jahr = वर्ष, संवत्सर.

Die Minute = मिनिट.

Die Sekunde = सेकंड.

Der Tag = दिवस.

Die Woche = आठवडा.

Das Haar = केस.

Der Buchstabe = अक्षर.

Die Stunde = घंटा, तास.

Das Auge = डोळा.

Die Tinte = शाई.

---

( पुढील वाक्यें व शब्द पुनःपुनः वाचून ध्यानांत ठेवावेत. )

Eine Minute hat sechzig Sekunden.
Eine Stunde hat sechzig Minuten.
Ein Tag hat vierundzwanzig Stunden.
Eine Woche hat sieben Tage.
Die Namen der Tage sind :—Sonntag,

Montag, Dienstag, Mittwoch, Donnerstag.
Freitag, Samstag, oder Sonnabend.

Der Sonntag ist der erste (पहिला) Tag der Woche, der Samstag der letzte. ( शेवटचा )

Der Norden = उत्तर. Der Suden = दक्षिण.
Der Osten = पूर्व. Der West = पश्चिम.
Nord, Ost, West, Süd = (सामासिक शब्दांमध्यें असे शब्द वापरले जातात).

त्याचप्रमाणें—

Der Januar. Februar, Marz, April, Mai, Juni, Juli, August, September, Oktober, November, Dezember.

( पुढें वाचून लिहून काढावें. )

Ein Monat hat dreizig Tage. Ein Jahr hat zwolf Monate. Wie viele Tage hat ein Jahr? Ein Jahr hat, drei-hundert-fünfundsechzig Tage ( तीनशें पासष्ट.)

---

## भाषांतरासाठीं पाठ ५.

In Indien es ist sehr warm im Mai.
Im Juli und August es regnet sehr viel.
Dezember ist ein Wintermonat.
Der Marz ist der dritte Monat des Jahres.
Welches ist der vierte Monat?
Wie viele Tage hat eine Woche?
Wie viele Tage hat ein Monat?
Wie viele Monate hat ein Jahr?

---

# धडा चवथा.

## Vierte Lektion.

मराठीप्रमाणेंच जर्मन नामांनाही विभक्ती लागतात हें वर आलेंच आहे, पण त्या चारच म्हणजे प्रथमा, षष्ठी, चतुर्थी व द्वितीया अशा आहेत. हीं विभक्तीचीं रूपें व्यवस्थित मांडण्यासाठीं नामांचे एकंदर पांच प्रकार केलेले आहेत.

**प्रकार १:**—यांत, पुल्लिंगी व नपुंसकलिंगी अनेक अवयवी शब्द ज्यांचें अंत्य el, en, er, chen आणि lein असें असतें त्यांचा समावेश होतो.

**प्रकार २:**—यांत अंत्य e असलेले किंवा पूर्वी e असून आतां नाहींसे झालेले पुल्लिंगी शब्द येतात.

त्याचप्रमाणें परभाषेंतलें ज्यांचें अंत्य al, an, ar, ast, ier किंवा स्वरित or, नाहीं असे शब्द यांत येतात.

**प्रकार ३ :**—

यांत एक अवयवी सारे पुल्लिंगी शब्द, व तसेच अनेक अवयवी, ig, ich, ing, ling, अंत्य असलेले व, al, an, ar, ast, ier, ( स्वरित ) or, अंत्य असलेले परकी शब्द यांचा समावेश होतो.

**प्रकार ४ :**—

यांत साऱ्या स्त्रीलिंगी शब्दांचा समावेश होतो.

**प्रकार ५ :**—

यांत el, en, er, chen, lein अंत्य नसलेले सारे नपुंसकलिंगी शब्द येतात.

---

## पुढील नियम ध्यानांत ठेवावे.

( १ ) एकवचनामध्यें स्त्रीलिंगी नामांच्या विभक्तींत कोठेंच फरक होत नाहीं.

( २ ) सर्व नपुंसकलिंगी शब्दांना व दुसरा प्रकार खेरीज करून सर्व पुल्लिंगी शब्दांना षष्ठीचीं s किंवा es हीं विभक्तीचीं रूपें लागतात.

( ३ ) सर्व नपुंसकलिंगी व दुसरा प्रकार खेरीज करून सर्व पुल्लिंगी नामांची द्वितीया विभक्ती ही प्रथमेसारखीच असते.

( ४ ) अनेक वचनामध्यें प्रथमा, षष्ठी व द्वितीया या सारख्याच असतात.

( ५ ) चतुर्थीच्या अनेकवचनाला **नेहमीं** n हें लागलेंच पाहिजे.

( ६ ) a, o, u, au असलेले एक अवयवी शब्द अनेकवचनांमध्यें स्वरांतरित होतात.

जसें:—ȧ, ȯ, u, äu.

सामासिक शब्द असल्यास त्यांतील अंत्य शब्दच तेवढा चालतो ( म्हणजे त्यालाच विभक्तीचीं रूपें लागतात.)

---

## सूत्ररूप.

प्रकार १:--

| | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्रथमा:-- | ...... | ...... |
| षष्ठी:— | s | ...... |
| चतुर्थी:— | ...... | n |
| द्वितीया:— | ...... | ...... |

---

## उदाहरण. Der Vater.

| | एकवचन | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्रथमा:— | Der Vater | Die Vater. |
| षष्ठी:— | Des Vaters | Der Vater. |
| चतुर्थी:— | Dem Vater | Den Vatern. |
| द्वितीया:— | Den Vater | Die Väter. |

---

## शब्द—Wörter.

| | | | |
|---|---|---|---|
| Der Apfel | = सफरचंद. | Der *Adler | = गरुडपक्षी. |
| „ Diener | = नोकर; चाकर. | „ *Amerikaner | = अमेरिकन गृहस्थ. |
| „ Flugel | = पंख. | „ Englander | = इंग्रज. |
| „ Himmel | = स्वर्ग. | „ Hammer | = हतोडा. |
| „ Lehrer | = शिक्षक, मास्तर. | „ *Kuchen | = केक, पोळी. |
| „ Löffel | = चमचा. | „ *Maler | = चित्रकार. |
| „ *Onkel | = चुलता, मामा. | „ Schneider | = शिंपी. |
| „ Regen | = पाऊस, | „ Schwager | = मेहुणा. |
| „ Schlussel | = किल्ली, | „ *Sommer | = उन्हाळा. |

---

* अशी खूण असलेल्या शब्दांच्या अनेकवचनामध्यें स्वरांतरित होत नाहीं. Der Amerikaner = die Amerikaner. Der Adler, die Adler. इत्यादि.

„ Schuler = विद्यार्थी
„ Spiegel = आरसा,
„ Teller = ताट, बशी.
„ *Tropfen = थेंब.
„ Vogel = पक्षी.

---

## नपुंसकलिंगी शब्दांची विभक्ती.

उदाहरण :—Wasser = पाणी.

| | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्रथमा :— | Das Wasser | Die Wasser. |
| षष्ठी :— | Des Wassers | Der Wasser. |
| चतुर्थी:— | Dem Wasser | Den Wassern |
| द्वितीया:— | Das Wasser | Die Wasser. |

त्याचप्रमाणें पुढील शब्दही चालत त.

Das Feuer = अग्नि.
„ Messer = चाकू.
„ Wetter = हवा.
„ Fenster = खिडकी.
„ Baumchen = लहानसें झाड.
„ Blumchen = नाजुकसें—लहानसें-फूल.
„ Veilchen = व्हायोलेट नांवाचें फूल.
„ Madchen = कुमारिका, मुलगी.
„ Waldchen = लहानसें जंगल.

---

| | पुल्लिंग. | | नपुंसकलिंग. |
|---|---|---|---|
| प्रथमा:— | ein Diener | नोकर. | ein Zimmer = खोली. |
| षष्ठी:— | eines Dieners | „ | eines Zimmers |
| चतुर्थी:— | einem Diener | „ | einem Zimmer |
| द्वितीया:— | einen Diener | „ | ein Zimmer. |

**टीप:— पुढील शब्दांचें अंत्य पूर्वी e असे, पण आतां तें नाहींसें झालें आहे. प्रथमा विभक्तीमध्यें आणखी एक n त्यांना लागत**

**असतो इतर वेळीं त्यांचें अंत्य en आहे असें कल्पूनच विभक्तींचीं रूपें तयार होतात.**

| | | | |
|---|---|---|---|
| Der Buchstabe | = मूळाक्षर. | Der Gedanke | = विचार. |
| „ Felsen | = खडक. | „ Glaube | = विश्वास. |
| „ Friede (n) | = शांति, तह. | „ Name | = नांव. |
| „ Funke (n) | = ठिणगी. | | |
| „ Haufe | = ढीग. | | |
| „ Same | = बीज, बी. | | |
| „ Wille | = इच्छा, इच्छाशक्ति. | | |

---

## विभक्तीचीं रूपें.

| एकवचन | अनेकवचन. |
|---|---|
| प्र:—Der Name | die Namen. |
| ष:—Des Namens | der Namen. |
| च:—Dem Namen | den Namen. |
| द्वि:—Den Namen | die Namen. |

---

पुढील शब्दांचें एकवचन वरील प्रमाणेंच असून अनेक वचनांत मात्र n किंवा अंत्य or असल्यास en लागते.

| | | |
|---|---|---|
| जसें:—Der | Bauer | = शेतकरी. ( अने. die Bauern ) |
| „ | Bayer | = बव्हेरियांतील मनुष्य. |
| „ | Vetter | = चुलतभाऊ, आतेभाऊ, मावसभाऊ. |
| „ | Nachbar | = शेजारी. |
| „ | Stachel | = नांगी. |
| „ | Pantoffel | = पायताण, जोडा. |
| „ | Muskel | = स्नायू. |
| „ | Professor | = आचार्य. |
| „ | Doktor | अध्वर्यू, वैद्य. |

---

Des Bauers. — Den Bauern.

Dem Professor. — Den Professoren.

## शब्द - Wörter.

Der Direktor = मुख्य, मुख्याध्यापक, चालक.
Das Glaschen = छोटा आरसा, किंवा कांच.
Der Anfangsbuchstabe = शब्दांतील पहिलें अक्षर. आदि.
Das Stuck = तुकडा, Das Bild = चित्र.
Die Schule = शाळा, gross = मोठा
hell = झगझगीत, उजेड असलेले.
da = तेथें, hier = येथें.
woher = कोठून? wohin = कोठें ?
mit = बरोबर, सह.

---

## तोंडपाठ करण्यासाठीं.

( Auswendig lernen, )

Du bist wie eine Blume.
So hold und schon und rein
Ich schaue dich an und Wehmut
Schleicht mich ins Herz hinein.
Die Scherben vor meinem Fenster.
Bethaute ich mit Tranen, ach !
Als ich am fruhen Morgen.
Dir diese Blumen brach.

---

## भाषांतरासाठीं पाठ ६.

( Aufgabe fur Ubersetzung. )

In meinem Zimmer habe ich viele Bucher. In meinem (Postkartenalbum habe ich uber ( अधिक, वर ) vierhundert Postkarten. Im Winter ist es kalt, im Sommer warm. Die Sonne scheint am Tage, der Mond in der Nacht ( रात्र ). Im Winter ist das Wasser kalt, manchmal (कधीं कधीं) es ist eiskalt. Bitte geben Sie mir eine Tasse Kaffee, mit Milch ( दूध ) und Zucker. Der Kork ist auf der Flsche. Ich spreche deutsch जर्मन ). Wir sprechen franzósisch (फ्रेंच). Du spricht marathi.

Meine Schwester spricht English. Seine Frau ist eine Engländerin. Mein Bruder wohnt in Deutschland aber mein Freund wohnt in Amerika. Haben Sie England gesehen? Nein ich war in Frankreich (फ्रान्स). Mein Lehrer ist mein Vater. Meine Mutter lehrt meine Schwester. Mein Onkel ist ein Bruder meines Vaters. Die Schwester meines Vaters ist meine Tante. Nicht wahr? (खरें ना?) Gopal ist der Namen meines Bruders und Kamala ist der Namen meiner Schwester. Die kleine (छोटी) Tochter meines Bruders hat einen Bruder. Der Namen ihres Bruders ist Narayan. Unser Haus ist in einem Garten. Dieser Mann ist mein Diener, aber jener Mann ist ein Diener meines Vaters. Jene Frau ist eine Schwester meiner Mutter. Ich habe den Prasidenten des "Legislative Assembly" nicht gesehen! Leider! (अरेअरे). Wollen Sie ihn sehen? Ja, sehr gerne! (मोठ्या खुषीनें).

---

## Fragen :—प्रश्न

Wie viele Postkarten habe ich in meinem Postkarten--album? Wann ist das Wasser kalt? Ich kann es nicht sagen! Warum nicht? Das ist doch sehr eintach. (सोपें) Trinken Sie eine Tasse Milch oder eine Tasse Kaffee? Ja ich trinke lieber eine Tasse Milch. Wo ist mein Bruder? Wer ist mein Vater? Wie heissen Sie. (तुमचें नांव काय?) Ich heisse Gopal, und meine Schwester heisst Godavari. Hast du den Lehrer gesehen?

---

## भाषांतरासाठीं पाठ ७.

तुला कॉफी पाहिजे कीं चहा पाहिजे ? (der Thee) मला दूध दे. मला एक कप दूध पाहिजे. हें चित्र माझ्या बाबांचें आहे, व हें चित्र माझ्या आईचें आहे. माझ्या काकाचें चित्र माझ्यापाशीं नाहीं. सूर्य दिवसा प्रकाशतो व चंद्र रात्रीं प्रकाशतो. रात्रीं अंधार ( dunkel ) असतो व दिवसा उजेड असतो. आज पाऊस पडत आहे. काल ( gestern ) पाऊस पडला. माझ्या आल्बममध्यें ४२ कार्डें आहेत. माझ्या भावाजवळ आणखी २२ कार्डें आहेत. तुम्ही राजाचा **मुगुट** पहिला आहे का ( Die Krone ) ? आम्ही

